ई-निविदासमिती गठीत करणेबाबत.
**मोटार वाहन प्रशिक्षण योजनेचे मुल्यमापन करण्यासाठी संस्था निश्चिती करणे**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-मोवाप्र २०१६/प्र.क्र.१६४/विजाभज-१**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय , मुंबई ४०० ०३२
दिनांक ४ फेब्रुवारी, २०१७

वाचा- शासन निर्णय नियोजन विभाग क्रमांक मुमाअ १०१६/ प्रक्र७८/ का-१४१७, दि.२२ जुलै२०१६

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण प्रवर्गाकरता मोटारवाहन चालक प्रशिक्षण योजनेअंतर्गत विमुक्त जाती, भटक्या जमाती इतर मागासवर्गीय मुलामुलींना देण्यात आलेल्या वाहनचालक/ वाहक प्रशिक्षणाच्या फी ची रक्कम रमेश मोटार ड्रायव्हींग स्कूल, जळगाव यांना अदा करण्यापूर्वी सदर योजनेअंतर्गत प्रशिक्षणार्थीना दिलेल्या प्रशिक्षणाचे मुल्यमापन करण्याबाबत शासकीय योजनांचे मूल्यमापन करण्याकरीता शासन निर्णयातील नामिका सूचीतील संस्थाकडून निविदा मागविण्याची कार्यपध्दती अनुसरणे, निविदांचे तांत्रिक व वाणिज्यिक मूल्यमापन करणे, निवडपध्दती, वाणिज्यिक प्रस्तावामध्ये समावेश करावयाच्या अपेक्षितबाबी,करारनाम्याचा मसुदा याबाबत निर्णय घेण्याकरीता विभागाच्या स्तरावर ई-निविदा प्रक्रिया पार पाडता यावी, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागातंर्गत ई- निविदा समिती स्थापन करावयाची बाब शासनाच्य विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रसिध्द केलेल्या संस्थाकडून ई-निविदा कार्यपध्दतीनुसार प्रस्ताव मागवून संस्थानिश्चिती करण्यासाठी सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागासाठी खालील प्रमाणे ई-निविदा समिती गठीत करण्यात येत आहे.

१) सह/उपसचिव विजाभज-१ सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग मंत्रालय मुंबई - अध्यक्ष
२) सहसंचालक, विजाभज,इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य पुणे,- सदस्य
३) अवर सचिव,विजाभज-१ सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग मंत्रालय.मुंबई - सदस्य
४) आयटी सल्लागार - सदस्य
५) कक्ष अधिकारी विजाभज-१सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग मंत्रालय,मुंबई-सदस्य सचिव

सदर समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.

१. सदर योजनेअंतर्गत प्रशिक्षणार्थीना दिलेल्या प्रशिक्षणाचे मुल्यमापन करण्याबाबत शासकीय योजनांचे मूल्यमापन करण्याकरीता शासन निर्णयातील नामिका सूचीतील संस्थाकडून निविदा मागविण्याची कार्यपध्दती अनुसरणे,
२. निविदांचे तांत्रिक व वाणिज्यिक मूल्यमापन करणे,
३. निवडपध्दती, वाणिज्यिक प्रस्तावामध्ये समावेश करावयाच्या अपेक्षितबाबी,करारनाम्याचा मसुदा याबाबत कार्यवाही करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२०४१२३३२५६९२२ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jalandhar Madhav Gosavi

Digitally signed by Jalandhar Madhav Gosavi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=010ebf10ad01f09c23969e1d80b48a44066a9122f464e555f80af35b24d57d93, cn=Jalandhar Madhav Gosavi
Date: 2017.02.04 12:35:20 +05'30'

( जा.मा.गोसावी )
सह सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, महाराष्ट्र राज्य पुणे
२. महालेखापाल महाराष्ट्र १ ( लेखा व अनुज्ञेयता ),महाराष्ट्र ,मुंबई
३. महालेखपाल ( लेखापरिक्षा),मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
५. संचालक,लेखा व कोषागारे,प्रशासकीय इमारत,मुंबई
६. अधिदानव लेखा अधिकारी,मुंबई
७. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय,मुंबई
८. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील सर्व सहसचिव/उप सचिव/कक्ष अधिकारी
९. उप सचिव,नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
१०.उप सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
११.निवड नस्ती.